राज्यातील अकृषी विद्यापीठाच्या संलग्नित
अनुदानित महाविद्यालयांतील प्राचार्यांना
घरभाडेभत्ता देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
शासन निर्णय क्रमांकः- घभाभ-२००९/ प्र.क्र. ३९३ /०९/ मशि ५
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १६ सप्टेबर, २०११.

वाचावे : १) शासन निर्णय शिक्षण, सेवा योजन व युवक सेवा विभाग
क्रमांक :एनजीसी १२७९/१५७७९६/ XXV, दिनांक ०३ /१०/१९७९
२) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक सीपीए-१४८०/सीआर ३३३/सेवा-५, दि. १५/०३/१९८०
३) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक वेपुर-१२८७/६४३/सेवा -१०, दि.२५/०४/१९८८
४) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक घभाभ १०९०/ प्रक्र १०/ सेवा-५, दि.५/०२/१९९०
५) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक घभाभ १०९०/ प्रक्र ४०/ सेवा-५, दि.३०/१२/१९९१
६) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक घभाभ १०००/ प्रक्र ६१/ सेवा-५, दि.२४/०५/२००१
७) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः घभाभ १००४/ प्रक्र २८/ सेवा-५, दि.२१/०९/२००६
८) शासन शुध्दिपत्रक वित्त विभाग क्रमांकः घभाभ १००४/ प्रक्र २८/ सेवा-५, दि.२६/०२/२००७
९) शासन परिपत्रक उच्च व तंत्र शिक्षण आणि सेवायोजन विभाग क्र एनजीसी-१२९२/(२४७६)-विशि-४, दि. १/०२/१९९६

**प्रस्तावना :-** राज्यातील अकृषी विद्यापीठाच्या संलग्नित अनुदानित महाविद्यालयांतील प्राचार्यांना त्यांच्या व्यवस्थापनाने निवासस्थान पुरविले असल्यास, अशा निवासस्थानासाठी, संबंधित व्यवस्थापनाला / संस्थेला त्या प्राचार्यांकडून त्यास अनुज्ञेय होणारा घरभाडे भत्ता अधिक संबंधित प्राचार्यांना पुरविलेल्या निवासस्थानासाठी असे निवासस्थान जर शासकीय अधिकाऱ्यांना पुरविले असते तर शासनाकडील तरतुदीनुसार वसूल केल्या जाऊ शकणाऱ्या अनुज्ञप्ती शुल्काच्या रकमेएवढी रक्कम वसूल करण्याबाबत वरील संदर्भाधीन क्र.९ येथील परिपत्रकानुसार आदेश देण्यात आले आहेत. त्यास महाराष्ट्र फेडरेशन ऑफ प्रिन्सिपल असोशिएशन यांनी याचिका क्र ५४३९/२००५ अन्वये आव्हान दिले होते. सदर याचिकेवर मा. उच्च न्यायालयाने दि. ८-१२-२००५ रोजी पुढील प्रमाणे आदेश दिले आहेत.

" In our opinion reading Government Resolution dated 1st February,1996 makes it clear that what is applicable is G.R. dated 25-4-1988 and G.R. dated 5th February, 1990 together with modifications. If that is so, then the HRA payable to such College principals

would be the HRA plus 10% of the admissible allowances as set out earlier. This does not confer power to pay less than what they were entitled to under the G.Rs. Apart from that after making the scheme applicable to the teaching and non-teaching staff including principals the Government cannot create two classes without showing some intelligible differentia. If that be done the same would amount be discretionary and the violation of Article 14 of the Constitution of India.

In the light of the above petition made absolute in terms of prayer clauses (a), (b), and (c). "

उक्त आदेशाच्या विरोधात शासनाकडून विशेष अनुमती याचिका क्र.२९६१/२००७ दाखल करण्यात आली असता दि.०२.०४.०७ रोजी विलंबाच्या कारणास्तव नाकारलेली आहे. या निर्णयाविरोधात सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुमती याचिका क्र (सी) ६६२३/२००७ मधिल पुर्नविलोकन याचिका क्र.(सी) नं ३/२००९ शासनातर्फे दाखल केली असता ती सर्वोच्च न्यायालयाने दि.१६.०७.०९ रोजी विलंबाच्या कारणास्तव नाकारली.

मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.५४३९/२००५ मध्ये दि ८.१२.२००५ रोजी दिलेल्या निकालाच्या विरोधात मा.उच्च न्यायालय मुंबई येथे सिव्हिल ॲप्लिकेशन नं ११७९/२००९ व पुर्नविलोकन याचिका स्टॅ.क्र. ८८०८/२००९ दाखल करण्यात आली होती व तीही दिनांक ५.८.२००९ रोजी विलंबाच्या कारणास्तव नाकारुन निकाली काढण्यात आली.

सदर निकालाची अंमलबजावणी शासनाकडून न झाल्याने असोसिएशनने याचिका क्र. ५४२९/२००५ मध्ये अवमान याचिका क्र.११६/२००८ दाखल केली, त्या दरम्यान मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्या दि.८/१२/२००५ रोजीच्या आदेशाच्या विरोधात मा. सर्वोच्च न्यायालयात शासनाने विशेष अनुमती याचिका क्र २७१११/२००९ दाखल केली व ती मा. सर्वोच्च न्यायालयाने दि.१४/०३/२०११ रोजीच्या आदेशान्वये खारीज केली. सदरहु विशेष अनुमती याचिका खारीज झाल्याने दि. २५/३/२०११ रोजी याचिका क्र ५४३९/२००५ च्या दि. ८/१२/२००५ च्या आदेशाची अंमलबजावणी करण्याचे नमुद करुन अवमान याचिका क्र ११६/२००८ निकाली काढली. त्या अनुषंगाने दि.८/१२/२००५ च्या न्यायनिर्णयावर कार्यवाही करणे आवश्यक आहे.

**शासन निर्णय :-** ज्या शासकीय कर्मचाऱ्यांना त्यांच्या सेवाशर्तीनुसार भाडेमाफ निवासस्थान अनुज्ञेय आहे अशा सरकारी अधिकारी / कर्मचारी यांना जर शासनाने निवासस्थान उपलब्ध करुन दिले नाही तर अशा शासकीय अधिकारी / कर्मचाऱ्यास नियमित घरभाडे भत्ता **अधिक दि.२५/४/१९८८ व दि.५/२/१९९० या वित्त विभागाच्या शासननिर्णयातील परिच्छेद क्र.५ नुसार वेतनाच्या १० टक्के अतिरिक्त घरभाडे भत्ता देय आहे.** हीच तरतुद राज्यातील अशासकीय अनुदानित महाविद्यालयातील **प्राचार्यांना** ज्यांना त्यांच्या सेवाशर्तीनुसार भाडेमाफ निवासस्थान मान्य असल्याची तरतुद आहे त्यांना लागु आहे. शासन निर्णय वित्त विभाग दि.३०/१२/१९९१ च्या परि.६ मधील **तरतुदी**

नुसार सर्वसाधारणपणे देय होऊ शकणारा घरभाडे भत्ता अधिक वेतनाच्या आधारे ज्या प्रकारचे निवासस्थान मिळण्यास संबंधित कर्मचारी पात्र असेल त्या प्रकारच्या निवासस्थानासाठी आकारण्यात येणारे अनुज्ञप्ति शुल्क (Licence Fee) या आधारे घरभाड्याची रक्कम देय राहील. या तरतूदी दि. ३१/१२/१९९१ पासुन लागू करण्यात आलेल्या आहेत त्या त्याच दिनांकापासून अशासकीय अनुदानित महाविद्यालयातील प्राचार्यांना, ज्यांच्या सेवा शर्तीनुसार भाडे माफ निवासस्थान अनुज्ञेय आहे अशांना जशाच्या तशा लागू राहातील.

उच्च व तंत्रशिक्षण आणि सेवायोजना विभाग शासन परिपत्रक क्रं.एनजीसी-१२९६/(२४७६)-विशि-४ दिनांक १ फेब्रुवारी १९९६ मधील परिच्छेद क्र-५ रद्द करण्यात येत आहे.

याचिका क्रं.५४३९/२००५ मधील दिनांक ८/१२/२००५ च्या निर्णयाची अंमलबजावणी प्रस्तुत शासननिर्णयातील तरतूदीनुसार परिगणना करण्यात यावी. त्याबाबतचा खर्च प्रधान शिर्ष २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०३, विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०४, अशासकीय महाविद्यालयांना व संस्थांना सहाय्य (०१) (०१) अशासकीय कला, विज्ञान, वाणिज्य व विधी महाविद्यालयांना अनुदान (२२०२०८७२)या अंतर्गत सन २०११-१२ या आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतुदीतुन भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय विधी व न्याय विभागाच्या अनौ २४५/सिव्हिल/अे ब्रँच दि.१०/०६/२०११ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २०४/११/सेवा-५ दि. ०६ /०९/२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०११०९१७१५१२११००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

( स्वा. अ. बोरसे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. सर्व विभागीय सहसंचालक,(उच्च शिक्षण) महाराष्ट्र राज्य.
३. सर्व कुलसचिव, अकृषी विद्यापीठे, महाराष्ट्र राज्य.
४. मशि / विशि तील संबंधित कार्यासने, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. निवडनस्ती - मशि ५